**नोंदणी व मुद्रांक विभागाच्या संगणकीकरणाकरीता दि.०१ सप्टेंबर, २००४ रोजीच्या शासन निर्णयांन्वये गठीत करण्यात आलेल्या प्रकल्प अंमलबजावणी समितीमध्ये सुधारणा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन शुध्दिपत्रक क्रमांकः मुद्रांक-२०२०/प्र.क्र.१९०/म-१(धोरण)**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: ०४ नोव्हेंबर, २०२०.

वाचा-

१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.मुद्रांक-२००१/२७६/प्र.क्र.१०२/म-१, दि.२० ऑगस्ट, २००१.
२) महसूल व वन विभाग, शासन ज्ञापन क्र.आस्थापना-२००१/प्र.क्र.४१०/म-१, दि.३१ ऑक्टोबर, २००१.
३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.आस्थापना-२००४/२४३९/प्र.क्र.४६८/म-१, दि.०१ सप्टेंबर, २००४.
४) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.नोंदणी (संगणक)-२०१५/१५१७/प्र.क्र.४५२/म-१, दि.०८ ऑक्टोबर,२०१५.
५) प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग यांचे अ.शा.पत्र क्र.एईओ-१११६/१०/२०१६/दहा, दि.२८ फेब्रुवारी, २०१६.
६) महसूल व वन विभाग, शासन शुध्दिपत्रक क्र.मुद्रांक-२०१७/३२६६/प्र.क्र.५०४/म-१,दि.१९ जून, २०१८.

प्रस्तावना:-

खाजगी करणाच्या माध्यमातुन नोंदणी व मुद्रांक विभागाचे संगणकीकरण करण्याच्या उद्देशाने संदर्भ क्र.१ मध्ये नमुद दि.२० ऑगस्ट, २००१ रोजीच्या शासन निर्णयांन्वये, 'बांधा-वापरा-हस्तांतर करा' या तत्वावर खाजगी सहभागाव्दारे नोंदणी विभागाचे संगणकीकरण करण्यास शासन मान्यता देण्यात आली आहे. सामान्य प्रशासन विभागाच्या दि.२९ ऑक्टोबर, २००१ रोजीच्या शासन निर्णयानुसार नोंदणी व मुद्रांक विभागाच्या संगणकीकरणाकरीता मा.सचिव (मदत कार्य व पुनर्वसन) यांचे अध्यक्षतेखाली संदर्भ क्र.३ अन्वये दि.०१ सप्टेंबर, २००४ रोजी निर्गमित शासन निर्णयांन्वये प्रकल्प अंमलबजावणी समिती गठीत करण्यात आली आहे.

२. संदर्भ क्र.५ मध्ये नमुद मा.प्र.स.(सेवा), सामान्य प्रशासन विभाग यांचे दि.२८ फेब्रुवारी, २०१६ रोजीच्या अ.शा. पत्रांन्वये महसूल व वन विभागांतर्गतचा मुद्रांक शुल्क व नोंदणी हा विषय प्रधान सचिव, महसूल (खुद्द) या विभागाकडे सोपवुन प्रधान सचिव, महसूल (खुद्द) पदाचे पदनाम प्रधान सचिव, (महसूल, मुद्रांक शुल्क व नोंदणी), महसूल व वन विभाग असे करण्यात आले असल्याने संदर्भ क्र.३ अन्वये निर्गमित शासन निर्णयामध्ये सुधारण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन शुध्दिपत्रक:-</u>**

प्रस्तावनेत नमुद पार्श्वभूमी लक्षात घेता, प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग यांच्या संदर्भ क्र.५ येथील दि.२८ फेब्रुवारी, २०१६ रोजीच्या अ.शा. पत्रास अनुलक्षुन नोंदणी व मुद्रांक विभागाच्या संगणकीकरणाकरीता संदर्भ क्र.३ अन्वये दि.०१ सप्टेंबर, २००४ रोजी निर्गमित केलेल्या शासन निर्णयामध्ये दि.२८ फेब्रुवारी, २०१६ रोजीच्या प्रभावाने खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे;-

(१) गठीत समितीतील अनुक्रमांक १ मधील, "सचिव (मदत कार्य व पुनर्वसन)", याऐवजी, "अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव (महसूल,मुद्रांक शुल्क व नोंदणी)", असे वाचावे;

(२) गठीत समितीतील अनुक्रमांक ४ मधील, "नोंदणी उपमहानिरीक्षक (संगणकीकरण), पुणे मुख्यालय-समिती सचिव", याऐवजी, "नोंदणी उपमहानिरीक्षक (संगणकीकरण),नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यालय-सदस्य सचिव", असे वाचावे;

(३) गठीत समितीतील अनुक्रमांक ७ नंतर, "अनुक्रमांक ८) राष्ट्रीय सुचना केंद्र (NIC) यांचे प्रतिनिधी-सदस्य", असा नव्याने समावेश करण्यात यावा.

याशिवाय, नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे विनंती तथा आवश्यकतेनुसार प्रकल्प अंमलबजावणी समितीचे अध्यक्ष यांच्या मान्यतेने अन्य अधिकारी/प्रतिनिधी यांना निमंत्रित सदस्य म्हणुन बोलविण्यात येईल.

सदर शासन शुध्दिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०११०४१६१५०००६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRITAMKUMAR VASANTRAO JAWALE

Digitally signed by PRITAMKUMAR VASANTRAO JAWALE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=87cc7562ae4425665bebfcb265aa4a6ae1cea07b580617493a4425e224dee8d9, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=337788b3391c7f722143d26eeea9befcdad091509ef5236580a7d753d8635115, ou=REVENUE, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=PRITAMKUMAR VASANTRAO JAWALE
Date: 2020.11.04 16:18:04 +05'30'

**( प्रितमकुमार जावळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.उपमुख्यमंत्री महोदयांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.सभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
५. मा.अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई

६. सर्व मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
८. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
९. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई
१०. सर्व विभागीय आयुक्त
११. महालेखापाल-१ व २ (मुंबई/नागपूर), महाराष्ट्र राज्य
१२. जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे
१३. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे
१४. अपर मुद्रांक नियंत्रक, प्रधान मुद्रांक कार्यालय, मुंबई
१५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१६. निवडनस्ती, कार्यासन म-१ (धोरण), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई